**भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, पुणे या कार्यालयातील अधिक्षक, वर्ग-२ पदावरील प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत.**
**श्री.दि.रा.गायकवाड, सहायक कक्ष अधिकारी.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि-२५१८/प्र.क्र.१०४ /१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १४ सप्टेंबर, २०२०

<u>वाचा:</u> १) सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रतिनि-२५१८/प्र.क्र.१०४ /१४-अ दिनांक २८-०८-२०१८ चे शासन आदेश.
२) सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, पुणे विभाग, पुणे यांचे जा.क्र. सप्रा/भानिकान्या/११७/२०२०, दिनांक २३-०७-२०२० चे पत्र.
३) श्री.दि.रा.गायकवाड, सहायक कक्ष अधिकारी (अधिक्षक वर्ग-२), भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, पुणे विभाग, पुणे यांचे दिनांक २२-०७-२०२० चे निवेदन.

**शासन आदेश**

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक २८-०८-२०१८ च्या आदेशान्वये श्री.दि.रा.गायकवाड, सहायक कक्ष अधिकारी, ग्राम विकास विभाग यांच्या सेवा २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने **भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, पुणे विभाग, पुणे** या कार्यालयात अधिक्षक, वर्ग-२ या पदावर उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या. त्यानुसार श्री. गायकवाड हे दिनांक ०४-०९-२०१८ पासून **भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, पुणे विभाग, पुणे** येथे प्रतिनियुक्तीने कार्यरत आहेत. त्यांचा प्रतिनियुक्तीचा २ वर्षाचा कालावधी दिनांक ०३-०९-२०२० रोजी संपुष्टात आला आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, या शासन निर्णयास शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या-१२, दिनांक १६-०२-२०१८ अन्वये दि.१७-१२-२०१६ च्या शासन निर्णयातील परि.५ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे:-

**परि.क्र. ५(अ) (३)** :- प्रतिनियुक्ती प्रथमत: ३ वर्षासाठी देण्यात यावी व संबंधित अधिकाऱ्याची इच्छुकता व संवर्ग नियंत्रण विभागाचे सहमतीने हा कालावधी चौथ्या वर्षाकरिता वाढविण्यात यावा.

३. श्री.दि.रा.गायकवाड, सहायक कक्ष अधिकारी यांचे संवर्ग नियंत्रण या विभागाकडे असल्यामुळे व **भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, पुणे विभाग, पुणे** यांचे संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक २३-०७-२०२० च्या पत्रात श्री. गायकवाड यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत नमूद केलेली कौटुंबिक अडचण, वैद्यकीय कारण तसेच प्रशासकीय वस्तुस्थिती व संदर्भाधिन क्र. ३ येथील श्री. गायकवाड यांनी दिनांक २२-०७-२०२० च्या निवेदनात नमूद केलेली कौटुंबिक अडचण विचारात घेता श्री.गायकवाड यांच्या प्रतिनियुक्तीस दिनांक ०४-०९-२०२० पासुन पुढे २ वर्ष (दिनांक ०४-०९-२०२० ते दिनांक ०३-०९-२०२२) पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. प्रतिनियुक्ती संदर्भात सर्व अटी व शर्ती या विभागाचे आदेश क्र. प्रतिनि-२५१८/प्र.क्र.१०४ / १४-अ, दिनांक २८-०८-२०१८ च्या शासन आदेशात नमूद केल्याप्रमाणे असतील. त्यांच्या या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ अंतिम स्वरुपाची असून, त्यांना या पुढे कोणतीही मुदतवाढ देण्यात येणार नाही. तसेच त्यांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव पुन्हा भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, पुणे विभाग, पुणे तसेच गृहनिर्माण विभागाने या विभागाकडे सादर करु नये.

५. श्री.दि.रा.गायकवाड, सहायक कक्ष अधिकारी यांच्या अन्य प्रशासकीय बाबी ग्राम विकास विभाग व गृहनिर्माण विभाग/गृनिधो-१ यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१४१२३०२४६८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.09.14 12:32:34 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित कर्मचारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, पुणे विभाग, पुणे **(या कार्यालयामार्फत)**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, ग्राम विकास विभाग/गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, पुणे विभाग, गृहनिर्माण भवन, आगरकर नगर, अलंकार सिनेमा जवळ, पुणे-४११००१.
४) सह/उप सचिव (आस्थापना), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
५) सह/उप सचिव (गृनिधो-१), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६) सा.प्र.वि./का.क्र.१४-अ (संग्रहार्थ/निवड नस्ती).